**राज्यातील ८ जिल्हयात इतर मागासवर्ग प्रवर्ग तसेच वि.जा.भ.ज. प्रवर्गाची प्रचलीत आरक्षणाची टक्केवारी व प्रवर्गाची असलेली लोकसंख्या विचारात घेऊन यासंदर्भात उपाययोजना सुचविण्यासाठी मंत्रिमंडळास अहवाल सादर करण्याकरिता मा.मंत्री, अन्न व नागरी पुरवठा यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : बीसीसी २०२०/प्र.क्र.१५३ अे/१६-ब**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : १२ जून, २०२०.

**प्रस्तावना :**

राज्यातील ८ जिल्हयात इतर मागासवर्ग प्रवर्ग तसेच वि.जा.भ.ज. प्रवर्गाच्या आरक्षणाची टक्केवारी ही जिल्हयातील या प्रवर्गाच्या लोकसंख्येच्या तुलनेत विविध प्रवर्गाकरीता कमी झालेली असल्याने प्रचलीत आरक्षणाची टक्केवारी व प्रवर्गाची असलेली लोकसंख्या विचारात घेऊन यासंदर्भात उपाययोजना सुचविण्यासाठी मंत्रिमंडळास अहवाल सादर करण्याकरिता मा.मंत्री, अन्न व नागरी पुरवठा यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील ८ जिल्हयात इतर मागासवर्ग प्रवर्ग तसेच वि.जा.भ.ज. प्रवर्गाच्या आरक्षणाची टक्केवारी ही जिल्हयातील या प्रवर्गाच्या लोकसंख्येच्या तुलनेत विविध प्रवर्गाकरीता कमी झालेली असल्याने प्रचलीत आरक्षणाची टक्केवारी व प्रवर्गाची असलेली लोकसंख्या विचारात घेऊन यासंदर्भात उपाययोजना सुचविण्यासाठी मंत्रिमंडळास अहवाल सादर करण्याकरिता खालीलप्रमाणे मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | मा.मंत्री, अन्न व नागरी पुरवठा | अध्यक्ष |
| २. | मा.मंत्री (गृहनिर्माण) | सदस्य |
| ३. | मा.मंत्री (सामाजिक न्याय) | सदस्य |
| ४. | मा.मंत्री (इमाव, विजाभज, शैमाप्र) | सदस्य |
| ५. | मा. मंत्री (वने) | सदस्य |
| ६. | मा.मंत्री (आदिवासी विकास) | सदस्य |
| ७. | सचिव (साविस) | सदस्य सचिव |

२. सदर उपसमितीमध्ये सचिव, विधि व न्याय विभाग हे विशेष आमंत्रित असतील.

३. उपरोक्त उप समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल :-

१) राज्यातील पालघर, धुळे, नंदुरबार, नाशिक, यवतमाळ, गडचिरोली, रायगड व चंद्रपूर या आदिवासी बहुल जिल्हयातील इतर मागासवर्ग व विमुक्त जाती भटक्या जमाती या प्रवर्गाच्या आरक्षणाची सध्याची टक्केवारी व त्या-त्या प्रवर्गाची असलेली नवीनतम लोकसंख्या विचारात घेऊन जिल्हास्तरीय गट-क व गट-ड संवर्गातील सरळसेवेची पदे भरण्यासाठी आरक्षण निश्चितीसंदर्भात शासनास उपाययोजना सुचविणे.

२) समितीने आपला अहवाल तीन महिन्यात शासनास सादर करावा.

४. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२००६१२१२२७२८७८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rasik Ambadas Khadse

Digitally signed by Rasik Ambadas Khadse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdc00fa9bc45e4f7281973d193127b8989dfa5df6a7a694b005e562ebd5c840e, serialNumber=a47200a14b42f151489f73f3e47c9e8733991629b2302a3831b945146be88a80, cn=Rasik Ambadas Khadse
Date: 2020.06.12 12:34:11 +05'30'

**( र. अं. खडसे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. राज्यपाल यांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे सचिव
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद
५. मा.विरोधी पक्ष नेता, विधान सभा
६. सर्व विधान सभा सदस्य/ विधान परिषद सदस्य
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
८. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
९. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद)
१०. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान सभा)
११. सर्व विभागीय आयुक्त
१२. सर्व जिल्हाधिकारी
१३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१४. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई

१५. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
१६. प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१७. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, नागपूर, औरंगाबाद
१८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१९. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई
२०. सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२२. राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक
२३. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
२४. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका
२५. संचालक, समाजकल्याण, पुणे
२६. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
२७. संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
२८. संचालक, सेवायोजन, मुंबई
२९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
३०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
३१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३३. सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
३४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई
३५. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये, महाराष्ट्र राज्य
३६. निवड नस्ती, कार्यासन १६-ब.